केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियानांतर्गत चोपडा नगरपरिषदेच्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत. (रु.१.९५ कोटी)

**महाराष्ट्र शासन**

**नगरविकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक अमृत-२०२५/प्र.क्र.१९/नवि-३३**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : २२ मे, २०२५**

संदर्भ :-

१. केंद्र शासनाने केंद्र पुरस्कृत अमृत २.० अभियानाच्या ऑक्टोबर, २०२१ मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र: अमृत २०२२/प्र. क्र.१४१/नवि - ३३, दिनांक १४ जुलै, २०२२.
३. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र: अमृत २०२२/प्र.क्र.२०३/नवि - ३३, दिनांक १६ सप्टेंबर, २०२२.
४. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र : अमृत २०२३/प्र.क्र.३३१/नवि- ३३, दिनांक ०८ नोव्हेंबर, २०२३.
५. नगर विकास विभाग शासन निर्णय क्र: अमृत-२०२४/प्र.क्र.२०१/नवि-३३, दिनांक १३ मार्च, २०२४.
६. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जळगांव यांचे तांत्रिक मान्यतेचे आदेश क्र.मजीप्राविज/तांत्रिक मान्यता/२१३०/२०२४, दिनांक १३ सप्टेंबर, २०२४.
७. अमृत २.० अभियानांतर्गत गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय तांत्रिक मान्यता समितीच्या दिनांक १५ जानेवारी, २०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियानाची संदर्भाधीन अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ वर्षापासून राज्यामध्ये अंमलबजावणी करण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत पाणीपुरवठा, सरोवरांचे पुनरुज्जीवन व हरित क्षेत्र विकास इ. पायाभूत सुविधांची निर्मिती राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये करण्यात येणार आहे आणि यापूर्वीच्या अमृत अभियानांतर्गत समाविष्ट असलेल्या राज्यातील ४४ शहरांमध्ये मलनि:स्सारणाची सुविधा उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. त्यानुसार सदर अभियानांतर्गत राज्याच्या रु.२७,७९३ कोटी प्रकल्प किंमतीच्या राज्य जलकृती आराखडयास (फक्त Capex किंमत) केंद्र शासनाने मान्यता दिलेली आहे. यामध्ये चोपडा नगरपरिषदेच्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पाचा समावेश असून संदर्भाधिन क्र. ६ अन्वये कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जळगांव यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेनुसार त्यास राज्यस्तरीय तांत्रिक समितीच्या दिनांक १५ जानेवारी, २०२५ रोजीच्या बैठकीत मंजूरी दिलेली आहे. सदर प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियानांतर्गत चोपडा नगरपरिषदेच्या रु. १.९५ कोटी प्रकल्प किंमतीच्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पास परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद केलेल्या विवरणपत्रात नमूद केल्यानुसार व कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जळगांव यांनी दिनांक १३ सप्टेंबर, २०२४ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या तांत्रिक मान्यतेमधील अटी व शर्तीच्या अधीन राहून या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रकल्पाच्या वित्तीय आकृतीबंध पुढीलप्रमाणे :-

(किंमत रु.कोटी)

| नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | प्रकल्प किंमत | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ५० %) | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ४०%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या १० %) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **चोपडा नगरपरिषद** | **१.९५** | **०.९७५** | **०.७८०** | **०.१९५** |

२. चोपडा नगरपरिषदेच्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पातील घटक व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे.

| Sr. No. | Item Of Work | Amount |
|---|---|---|
| 1 | Excavation for roadway in earth, soil of all sorts, sand, gravel or soft murum including dressing section to the required grade, camber and side slopes & conveying the excavated materials with all lifts upto a lead | 68453 |
| 2 | Providing dry/trap/granite/ quartzite/gneiss rubble stone soling 15 cm to 20 cm thick including hand packing & compacting etc. complete. | 143967 |
| 3 | Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete in M-10 of trap/granite/ quartzite/gneiss metal for foundation and bedding including bailing out water, Steel centering, | 134772 |
| 4 | Providing and laying Cast in situ/ReadyMix cement concrete in M15of trap/g Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete in M15 of trap/ granite/quartzite/gneiss metal for bed | 1158924 |
| 5 | Providing second class Burnt Brickma sonry with conventional/I.S.type bricks in cement mortar1:6 in superstructure including’s triking joints, raking out joints, watering and scaf folding etc. Complete | 1404359 |
| 6 | Providing rough cast cement plaster externally in two coats to concrete, brick or stone masonry surfaces in all positions with base coat of 12 to 15 mm thick in C.M. 1:4 and rough cast | 375795 |
| 7 | Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete in M 25 of trap/ granite/quartzite/ gneiss metal for R.C.C. beams and lintels as per detailed designs and drawings or as | 417685 |
| 8 | Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete M-25 of trap /granite /quartzite/ gneiss metal for R.C.C. work in foundations like raft, strip foundations, grillage and footings of | 268993 |

| Sr. No. | Item Of Work | Amount |
|---|---|---|
| 9 | Providing, cutting, bending, hooking, tying and laying in position TMT FE 500 steel bars for reinforcement for all RCC works as per detailed drawings etc. complete. | 2388739 |
| 10 | Providing and erecting chain link fencing 1.6 M. height with G.I. chain link of size 50 x 50 mm, 8 gauge thick and fixed 75 mm above ground level on vertical M.S. Angles of 40 x 40 x 6 mm size, includind | 923486 |
| 11 | Providing and fixing mild steel grill gate with angle iron frame 65mm x 65mm x 10mm with iron bars at 150mm C/C and diagonal flats as per the detailed drawing including hinges, pivot block | 119342 |
| 12 | Providing and applying two coats of exterior acrylic emulsion paint confirming to corresponding I.S. of approved manufacture and of approved color to the plastered surfaces | 401556 |
| 13 | Conveying materials obtained from road cutting including all lifts, laying in layers of 20cm. to 30cm. breaking clods, dressing to the required lines, curves, grades and section, watering and compacting to not | 112173 |
| 14 | Excavation for roadway in earth, soil of all sorts, sand, gravel or soft murum including dressing section to the required grade, camber and side slopes & conveying the excavated materials with all lifts upto a lead | 54256 |
| 15 | Supplying trap granite/quartzite/gneiss stone metal of required size by bringing the boulders / Rubble at the road side breaking them to required gradation including conveying the boulders /Rubble | 262527 |
| 16 | Providing dry/trap/granite/ quartzite/ gneiss rubble stone soling 15 cm to 20 cm thick including hand packing & compacting etc. complete. | 367315 |
| 17 | Supplying hard murum / kankar at the road site including conveying and stacking complete | 39931 |
| 18 | Spreading hard murum/soft murum/gravel or kankar for side width complete | 4270 |
| 19 | Providing and laying Cast in situ/Ready in M-10 of trap/ Mix cement concrete granite/quartzite/ gneiss metal for foundation and bedding including bailing out water, Steel centering, | 565478 |
| 20 | Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete M 15 of trap/ granite/quartzite/gneiss metal for coping to plinth or parapet, moulded or chamfered as per drawing or | 188044 |
| 21 | Providing second class Burnt Brick masonry with conventional/ I.S. type bricks in cement mortar 1:6 in foundations and plinth of inner walls/in plinth external walls including bailing out | 511585 |
| 22 | Providing sand faced plaster externally in cement mortar using approved screened sand, in all positions including base coat of 15 mm thick in cement mortar 1:4 using waterproofing | 329268 |
| 23 | Providing, cutting, bending, hooking, tying and laying in position TMT FE 500 steel bars for reinforcement for all RCC works as per detailed drawings etc. complete. | 253379 |
| 24 | Providing and applying two coats of exterior acrylic emulsion paint confirming to corresponding I.S. of approved manufacture and of Approved Colored to the plastered surface. | 168434 |
| 25 | Providing and lying machine cut machine polished Shahabad stone slabs 20 to 25 mm thick for treads and risers of steps and staircases, with rounded nosing for the treads on a bed of 1:4 cement. | 1052190 |

| Sr. No. | Item Of Work | Amount |
|---|---|---|
| 26 | Conveying materials obtained from road cutting including all lifts, laying in layers of 20cm. to 30cm. breaking clods, dressing to the required lines, curves, grades and section. watering and compacting to not | 88908 |
| 27 | Plantation of Tree in Sub Division jurisdiction road, Supplying tree, Transportation of tree, Tree guard for saftey | 1780000 |
| 28 | Providing and fixing H.D.P container one piece moulded water tank made out of low density polythyler and built | 114300 |
| 29 | Providing. laying and fixing jointing Eco drain 110 mm SN 8 Nu-Drain Upvc pipes or of equivalent make, manufacture as | 305838 |
| 30 | Providing, laying and fixing jointing Eco drain 160 mm SN 4 Nu-Drain Upvc pipes or of equivalent make, manufacture as | 475119 |
| 31 | Providing, laying and fixing jointing Eco drain 200 mm SN 4 Nu-Drain Upvc pipes or of equivalent make, manufacture as | 872613 |
| 32 | Providing & Fixing in position, MS fabrication work using angles, sqr tubes, c channels etc for various partition frame as | 441650 |
| 33 | Drip Lateral OD16mm CL2x400 Mtr | 22518 |
| 34 | DRIPPER SC-PC DRIPPER PLUS 8.2 Lph | 2536 |
| 35 | Drip Line Aqur Polygrommet To16x13mm | 264 |
| 36 | Drip Emitting Pipe Joiner 2.6416x16 OD | 156 |
| 37 | Drip Lateral End Stop "8"Shape 16 mm | 123 |
| 38 | 13 DIS/SIS PVC Non Return | 968 |
| 39 | Drawing 2D Painting of a Plastered Wall Surface including cleaning Preparing the Surface as Per Direction by Engineer In charge. Etc. Complete | 501310 |
| | Total | 16321224 |
| | Royalty | 103251 |
| | 18% GST Charges | 2937820 |
| | 1 % Insurance Charges | 163212 |
| | Grand Total | 19525508 |
| | **Say Rs** | **1.95 Cr.** |
| प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी कार्यादेश दिनांकापासून १२ महिने | | |

३. चोपडा नगरपरिषदेच्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पाची Opex किंमत चोपडा नगरपरिषदेने उभारणे आवश्यक आहे. सदर प्रकल्प पुर्ण करण्याचा कालावधी १२ महिने राहील.

४. चोपडा नगरपरिषदेच्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे: -

४.१. सदर प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा चोपडा नगरपरिषद राहील.

४.२. प्रकल्पासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा चोपडा नगरपरिषदेमार्फत भरण्यात यावा.

४.३. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना व राज्य शासनाच्या संदर्भाधीन शासन निर्णयानुसार सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.४.सदर प्रकल्पास मान्यता देताना राज्यस्तरीय तांत्रिक समितीने विहित केलेल्या सर्व अटींची पूर्तता करणे कार्यान्वय यंत्रणेवर बंधकारक राहील.

४.५.राज्य शासनाने संदर्भाधिन क्र. २ व ३ नुसार विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार सदर प्रकल्पाची निविदा प्रक्रिया व अंमलबजावणी विहित कालावधीमध्ये पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

४.६.महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने केंद्र पुरस्कृत अमृत २.० अभियानातील प्रकल्पांसाठी निर्गमित केलेल्या आदर्श निविदा पुस्तिकेनुसार प्रसिध्द करणे बंधनकारक राहील.

४.७.सदर प्रकल्पाच्या कामाचे कार्यादेश प्रशासकीय मंजूरीच्या आदेशापासून ४५ दिवसांच्या आत देण्यात येतील याची कार्यान्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

४.८. केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत केंद्र शासनाने विहित केलेल्या सुधारणांची (Reforms) पूर्तता विहित कालावधीत पूर्ण करणे संबंधित अभियान शहरास बंधनकारक राहील.

४.९.**निधी वितरणाची कार्यपद्धती:** केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियानाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार केंद्र शासन हिश्याचा निधी हा तीन टप्यात (२० %+ ४० %+ ४० % ) वितरीत केला जाणार आहे. त्यानुसार केंद्र शासनाकडून वितरीत निधीच्या प्रमाणात राज्य हिश्याचा निधी केंद्र हिस्सा वितरीत करताना सोबत वितरीत केला जाईल.

४.१०. अमृत अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पासाठी स्वहिश्याचा निधी उभारताना नागरी स्थानिक स्वराज संस्थांनी त्यांना प्राप्त होणाऱ्या वित्त आयोगाच्या निधीशी सांगड (Convergence) घालणे आवश्यक राहील. यासाठी त्यांनी वित्त आयोगातून मिळणारा निधी चिन्हांकीत करून ठेवावा.

४.११. सदर अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार सदर प्रकल्पासाठी वितरीत करण्यात येणारा निधी हा कार्यात्मक साध्यांवर (Functional Outcome) आधारित असणार आहे. तसेच, सदर कार्यात्मक परिणामाची पूर्तता न झाल्यास सदर प्रकल्पास निधी वितरीत करण्यात येणार नाही. सदर बाबींची पूर्तता करण्याची संपूर्ण जबाबदारी मुख्याधिकारी, चोपडा नगरपरिषद यांची राहील.

४.१२. सदर प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिश्याचा प्रथम हप्त्याचा निधी कार्यादेश निर्गमित केल्यानंतर चोपडा नगरपरिषदेस वितरीत करण्यात येईल. त्यानुसार केंद्र शासनाने विहित केल्यानुसार उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास सादर केल्यानंतर व कार्यात्मक साध्यांची पूर्तता केल्यानंतर पुढील हप्त्याचा केंद्र हिश्याचाव त्याप्रमाणात राज्य हिश्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

४.१३. केंद्र पुरस्कृत अमृत २.० अभियानाच्या वित्तिय आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज संस्था हिश्याचा निधी उभा करून सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात शासनास सादर करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेवर बंधनकारक असणार आहे.

४.१४. सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करताना दिलेल्या सूचनांनुसार, सदर प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाने वितरीत निधीच्या प्रमाणात चोपडा नगरपरिषदेने निधी उभारणे अनिवार्य राहील.सदर

प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

४.१५. राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील. राज्य शासनामार्फत त्याकरिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

४.१६. सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीत पूर्ण करण्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित कार्यान्वयन यंत्रणा, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार व प्रकल्प विकास व व्यवस्थापन सल्लागार यांची संयुक्तरीत्या राहील.

४.१७. प्रकल्पाचे काम सुरु झाल्यानंतर प्रकल्प व्यवस्थापक सल्लागाराने कामाची गुणवत्ता व देयके प्रमाणित केल्यानंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामाची देयके १५ दिवसांत संबंधित कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.१८. अमृत २.० अभियानांतर्गत मार्गदर्शक सूचनेनुसार संदर्भाधिन क्र.०३ नुसार सदर प्रकल्पासाठी प्रकल्प व्यवस्थापक सल्लागाराची नेमणूक करावी. त्यामध्ये नमूद केल्यानूसार प्रकल्प व्यवस्थापक शुल्क अदा करावे तसा ठराव संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करणे बंधनकारक राहील.

४.१९. चोपडा नगरपरिषदेच्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पासाठी स्वहिश्याची तरतूद, आवश्यक परवानग्या घेऊन व प्रकल्पातील सर्व उपांगाच्या जागा नगरपरिषदेच्या ताब्यात असल्याची खातरजमा मुख्याधिकारी, चोपडा नगरपरिषद यांनी करावी.

४.२०. चोपडा नगरपरिषदेस यापूर्वी इतर कोणत्याही योजनेंतर्गत मंजुर करण्यात आलेल्या प्रकल्पातील उपांगे व या प्रकल्पातील उपांगे यामध्ये व्दिरुक्ती (Duplication) होत नसल्याची खातरजमा करण्याची जबाबादरी संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्था, या प्रकल्पाचे प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार व PDMC यांची राहील.

५. केंद्र शासन पुरस्कृत केंद्र पुरस्कृत अमृत अभियान २.० अभियांनाच्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या सर्व मार्गदर्शक सुचना चोपडा नगरपरिषदेच्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पास लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२२१३१०२१०८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by SACHIN DATTATRAY SAHASRABUDDHE
Date: 2025.05.22 13:11:20 +05'30'

**(सचिन द. सहस्त्रबुध्दे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा .मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) विभाग यांचे खाजगी सचिव.

४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक.
५. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक.
६. प्रधान सचिव, पाणीपुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक.
७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय , नवी मुंबई.
१०. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई
११. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग.
१२. जिल्हाधिकारी, जळगांव.
१३. जिल्हा प्रशासन अधिकारी, जळगांव.
१४. मुख्याधिकारी, चोपडा नगरपरिषद, जि. जळगांव.
१५. निवडनस्ती, नवि-३३.